महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग, नाशिक/पुणे/ नागपूर/अमरावती/औरंगाबाद या महसूली विभागीय कार्यालयातील वित्तीय बाबींकरिता "विभाग प्रमुख" घोषित करणे ...

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक. आरटीएस-२०२१/प्र.क्र.२९९/लो.दि.कक्ष
मंत्रालय, विस्तार इमारत, ६ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :-१८ फेब्रुवारी, २०२२.

वाचा :- १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५.
२) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र.आरटीएस-२०१६/प्र.क्र.१२४ (१)/१८ (र. व का.), दि.३० जुलै, २०१६
३) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.आरटीएस-२०१७/प्र.क्र.५३/१८ (र. व का.), दि.२० मार्च, २०१७.
४) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र.आरटीएस-२०२१/प्र.क्र.१५८/लो.दि.कक्ष, दि.२३ नोव्हेंबर, २०२१.
५) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.आरटीएस-२०२१/प्र.क्र.४०/लो.दि.कक्ष, दि.१७ डिसेंबर, २०२१.
६) राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालयाचे अ.शा.पत्र क्र.विआका-२०२१/प्र.क्र.७१/मुसेहआ, दि.०८ डिसेंबर, २०२१.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम, २०१५ च्या कलम १३ मधील तरतूदीनुसार संदर्भाधिन दि.३० जुलै, २०१६ रोजीच्या अधिसूचनेन्वये "महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग" घटीत करण्यात आलेला आहे. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उप विभाग-एक मधील अनुक्रमांक-१, नियम क्रमांक २ अनुसार मुंबई वित्तीय नियम, १९५९ अंतर्गत नियमाखाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांनुसार संदर्भाधिन दि.२० मार्च, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये, राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालयातील उप सचिव यांना महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोगाचे "विभागप्रमुख" तसेच संदर्भाधिन दि.१७ डिसेंबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्य सेवा हक्क आयुक्त, कोकण विभाग कार्यालयातील उप सचिव /सह सचिव (उप सचिव हे पद भविष्यात सह सचिव पदात श्रेणी उन्नत झाल्यास) यांना राज्य सेवा हक्क आयोग, कोकण महसूली विभाग कार्यालयाचे "विभागप्रमुख" म्हणून घोषित करण्यात आलेले आहे.

महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम, २०१५ च्या कलम १३ अन्वये सर्व आयुक्त, महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग यांना राज्य मुख्य सेवा हक्क आयोगास वापरता येत असतील असे सर्व अधिकार वापरता येतील अशी तरतूद आहे. त्यामुळे जरी आयोगाच्या कामकाजाचे सर्वसाधारण अधीक्षण, निदेशन व व्यवस्थापन मुख्य आयुक्तांकडे निहीत असले तरी, प्रत्येक महसूली विभाग हे स्वतंत्र कार्यालय असल्याने सदर कार्यालयासाठी स्वतंत्र विभागप्रमुख नेमणे आवश्यक आहे, जेणे करुन तेथील विभागप्रमुखांना असणाऱ्या वित्तीय अधिकारामध्ये मर्यादित आर्थिक बाबींबद्दल राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग कार्यालयाची मंजूरी घेण्याची आवश्यकता लागणार नाही. राज्य सेवा हक्क आयुक्त, नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद या पदावर संदर्भाधिन शासन अधिसूचना दि.२३/११/२०२१

अन्वये नेमणुका करण्यात आल्या असून संबंधित आयुक्तांनी दि.०१/१२/२०२१ रोजी पासून त्यांचा पदभार स्विकारला आहे व सदर कार्यालये उभारणीसाठी आवश्यक वित्तीय बाबींचे नियोजन करण्याकरीता सदर कार्यालयांसाठी स्वतंत्र "विभागप्रमुख" घोषित करणे आवश्यक आहे. यास्तव राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालयाने वरीलप्रमाणे अभिप्राय नमूद करुन महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग, नाशिक/पुणे/ नागपूर/ अमरावती/औरंगाबाद या महसूली विभाग कार्यालयातील उप सचिव/सह सचिव यांना विभागप्रमुख घोषित करण्याबाबत संदर्भाधिन दि.०८ डिसेंबर, २०२१ रोजीच्या पत्रान्वये कळविले आहे. त्याअनुषंगाने शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय** :-

वित्त विभाग संदर्भाधिन शासन निर्णय दि.१७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टामधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उप विभाग-एक मधील अनुक्रमांक-१, नियम क्रमांक २ अनुसार मुंबई वित्तीय नियम, १९५९ अंतर्गत नियमाखाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांनुसार महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग, नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद महसूली विभाग कार्यालयातील **उप सचिव / सह सचिव (उप सचिव हे पद भविष्यात सह सचिव पदात श्रेणी उन्नत झाल्यास)** यांना महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोगाच्या सबंधित महसूली विभाग कार्यालयाचे **"विभाग प्रमुख"** म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**२.** तथापि, महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग, कोकण/नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद या ६ महसूली विभागीय कार्यालयातील उप सचिव हे पद रिक्त असल्यास / झाल्यास सदर रिक्त पदावर मंत्रालयातील कोणत्याही विभागातील उप सचिवाचे पद धारण करणाऱ्या किंवा राज्य शासनाच्या कोणत्याही कार्यालयातील उप सचिव पदाचे समतुल्य पद धारण करणाऱ्या अधिकाऱ्याची प्रतिनियुक्तीने नियुक्ती होईपर्यंत व त्यांनी सदर पदाचा कार्यभार स्वीकारलेल्या दिनांकापर्यंतच्या कालावधीत महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग, कोकण/नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद येथील विभागीय कार्यालयांसाठी दि.२० मार्च, २०१७ रोजीच्या शासन निर्णयानुसार राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालयातील "उप सचिव" तसेच उप सचिव हे पद भविष्यात सह सचिव पदात श्रेणी उन्नत झाल्यास "सह सचिव" हे "विभाग प्रमुख" राहतील.

**३.** हे अधिकार वित्तीय बाबी पुरतेच मर्यादित राहतील.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२२०२२२१७२०५९७४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Indra Mallo
Digitally signed by Indra Mallo
DN: c=IN, o=Personal, 2.5.4.20=92b852624baa852a6d07acef786c78e703b2b218958e8c193232b28a89b9cf9a, postalCode=400021, st=Maharashtra, serialNumber=ecae14ed1e3640fe493f5246d6381f68a38e03589870d467c9bac54f641fcf32, cn=Indra Mallo
Date: 2022.02.22 17:23:12 +05'30'

**( इंद्रा मालो )**
**सचिव (प्र.सु. व र. व का.)**

**प्रत:-**

१. राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२. राज्य सेवा हक्क आयुक्त, नाशिक/नागपूर/पुणे/अमरावती/औरंगाबाद ( राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालयामार्फत)
३. सर्व विभागीय आयुक्त (महसूल), महाराष्ट्र राज्य.
४. प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, वांद्रे, मुंबई.
७. सह सचिव, राज्य सेवा हक्क आयुक्त, कोकण महसूली विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
८. उप सचिव, राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
९. उप सचिव / अवर सचिव, कार्यासन-२६, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. कक्ष अधिकारी, कार्यासन अर्थ-१/व्यय-४/विनियम, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (लो.दि.कक्ष).